## विदर्भवादी नेते जांबुवंतराव धोटे यांचे निधन

माजी खासदार विदर्भवीर भाऊ जांबुवंतराव धोटे (वय ८३) शनिवारी पहाटे साडेतीनच्या सुमारास हृदयविकाराच्या तीव्र धक्क्याने निधन झाले. ते स्वतंत्र विदर्भाचे खंदे समर्थक होते.सेवाग्राम ते नागपूर ही पदयात्रा त्यांनी अलीकडेच स्वतंत्र विदर्भासाठी काढली होती.

ते १९७८ मध्ये नागपूर लोकसभा मतदारसंघातून लोकसभेत निवडून गेले. त्यावेळी त्यांनी काँग्रेसच्या बंडखोराचा पराभव केला होता. दिवंगत पंतप्रधान इंदिरा गांधी यांनी काँग्रेस सोडल्यानंतर त्यांनी इंदिरा गांधी यांच्या नेतृत्वात काँग्रेस (आय) मध्ये प्रवेश केला होता.

१९८० मध्ये ते सातव्या लोकसभेत पुन्हा नागपूर लोकसभा मतदारसंघातून निवडून गेले. त्यानंतर त्यांनी लवकरच काँग्रेस (आय) सोडून विदर्भ जनता काँग्रेस हा स्वत:चा पक्ष ९ सप्टेंबर २००२ रोजी स्थापन केला.

धोटे महाराष्ट्र विधानसभेवर पाच वेळा निवडून गेले होते. १९६२ मध्ये यवतमाळ विधानसभेचे त्यांनी आमदार म्हणून नेतृत्व केले. १९६७ ची निवडून त्यांनी फॉरवर्ड ब्लॉककडून लढली. तर १९७८ ची निवडणूक ते काँग्रेस पक्षाकडून लढले. ते काँग्रेसचे तत्कालीन प्रसिद्ध नेते रामराव आदीक यांचे जावई होत.

## पलानीस्वामी यांनी विश्वासदर्शक ठराव जिंकला

तामिळनाडू विधानसभेत मुख्यमंत्री ई. पलानीस्वामी यांनी विश्वासदर्शक ठराव जिंकला आहे. पलानीस्वामी यांना १२२ आमदारांनी पाठिंबा दिला असून ओ.पन्नीरसेल्वम यांना फक्त ११ आमदारांनीच पाठिंबा दिला आहे.

ई. पलानीस्वामी यांनी गुरूवारी मुख्यमंत्रिपदाची शपथ घेतल्यानंतर शनिवारी झालेल्या विश्वासदर्शक ठरावात एआयएडीएमकेच्या १२२ आमदारांनी पलानीस्वामी यांच्या बाजूने मतदान केले. पलानीस्वामी यांनी विश्वासदर्शक ठरावात ६४ मत मिळणे गरजेचे होते.

राज्याच्या इतिहासात अशा प्रकारचा विश्वासदर्शक ठराव ३० वर्षांत प्रथमच मांडण्यात आला होता.विरोधकांनी (पन्नीरसेल्वम गटाने) अम्मा सरकारविरोधात काम केले. पण आता अम्माचे (जयललिता) खरे समर्थक पुढे आले असे पलानीस्वामी यांनी सांगितले.

## भारतीय महिला संघाचा वर्ल्डकपमध्ये प्रवेश

कर्णधार मिताली राज आणि सलामीची फलंदाज मोना मेश्राम या दोघींच्या शानदार खेळीच्या बळावर भारतीय महिला क्रिकेट संघाने विश्वचषक पात्रता फेरीच्या सुपरसिक्स लढतीत बांगला देशचा ९९ चेंडू आधीच नऊ गड्यांनी पराभव करीत मुख्य फेरी गाठली.

महिला विश्वचषकाचे आयोजन इंग्लंडमध्ये २४ जून ते २३ जुलै या कालावधीत होणार आहे.

तसेच साखळीत सर्वच सामने जिंकणाऱ्या भारतीय संघाचे सुपरसिक्समध्ये चार सामन्यांतून आठ गुण झाले. त्यामुळे अंतिम फेरीतील स्थान निश्चित झाले आहे.

## आर्थिक स्वातंत्र्यात भारताचे स्थान घसरले

मागील वर्षभरात आर्थिक स्वातंत्र्याच्या बाबतीत भारताची पिछेहाट झाल्याची माहिती एका अहवालातून समोर आली आहे. जागतिक बाजारपेठेचा विचार करुन आर्थिक सुधारणांनुसार होणारी प्रगती 'असमान' असल्याचे द हेरिटेज फाऊंडेशनने म्हटले आहे.

अमेरिकेच्या 'द हेरिटेज फाऊंडेशन'कडून करण्यात आलेल्या सर्वेक्षणात भारत आर्थिक स्वातंत्र्याच्या बाबतीत जगात १४३ व्या क्रमांकावर असल्याचे समोर आहे. यामध्ये पाकिस्तानसोबत दक्षिण आशियातील अनेक देश भारतापेक्षा पुढे आहे.

भारतीय अर्थव्यवस्था गेल्या ५ वर्षांपासून ७ टक्क्यांनी वाढते आहे. मात्र आर्थिक वाढीचा फायदा सर्वांपर्यंत पोहोचलेला नाही. त्यामुळे आर्थिक स्वातंत्र्याचे संरक्षण करण्यात अपयश आले आहे,' असे द हेरिटेज फाऊंडेशनने त्यांच्या अहवालात म्हटले आहे.

द हेरिटेज फाऊंडेशनच्या भारताला ५२.६ गुण दिले आहेत. मागील वर्षाच्या तुलनेत भारताला ३.६ गुण कमी मिळाले आहेत. मागील वर्षात भारत आर्थिक स्वातंत्र्याच्या यादीत १२३ व्या क्रमांकावर होता. मात्र यंदा भारताची १४३ व्या क्रमांकावर घसरण झाली आहे.

आर्थिक स्वातंत्र्याच्या बाबतीत द हेरिटेज फाऊंडेशनने हाँगकाँग, सिंगापूर आणि न्यूझीलंडला अव्वल स्थान दिले आहे. चीनने गेल्या वर्षीच्या तुलनेत ५.४ अधिक गुणांची कमाई करत १११ वे स्थान पटकावले आहे. या यादीत अमेरिका ७५.१ गुणांसह १७ व्या स्थानी आहे.

दक्षिण आशियातील अफगाणिस्तान या यादीत १६३, तर मालदीव १५७ व्या स्थानी आहेत. भारताचे शेजारी असलेले सर्वच देश या यादीत भारतापेक्षा पुढे आहेत. या यादीत भूटान १०७ व्या, श्रीलंका ११२ व्या, नेपाळ १२५ व्या, बांगलादेश १२८ व्या तर पाकिस्तान १४१ व्या क्रमांकावर आहेत.

## मनूकुमार जैन 'शिओमी'च्या उपाध्यक्षपदी

चीनमधील आघाडीची मोबाईल उत्पादक कंपनी शिओमीच्या उपाध्यक्षपदी मनूकुमार जैन यांची निवड झाली आहे. मनू कुमार जैन हे सध्या शिओमीमध्येच भारतातील प्रमुख म्हणून कार्यरत होते. शुक्रवारी कंपनीने मनू कुमार जैन यांना उपाध्यक्षपदी बढती दिली आहे.

शिओमी ही चीनमधील आघाडीची मोबाईल उत्पादक कंपनी असून या कंपनीचे उपाध्यक्ष ह्यूगो बारा यांनी गेल्या महिन्यात राजीनामा दिला होता. शुक्रवारी एमआय इंडियाने मनूकुमार जैन यांना उपाध्यक्षपदी बढती दिल्याचे जाहीर करण्यात आले.

कंपनीतील उपाध्यक्ष पदासोबतच मनूकुमार जैन हे 'शिओमी'चे भारतातील प्रमुख म्हणूनही कामकाज बघत आहेत. मनूकुमार जैन हे जून २०१४ मध्ये शिओमी कंपनीमध्ये रुजू झाले होते. यापूर्वी ते जबाँगमध्ये काम करत होते.

जैन यांना बढती देऊन शिओमीने कंपनीसाठी भारतातील बाजारपेठ महत्त्वाची असल्याचे पुन्हा एकदा स्पष्ट केले. शिओमीची चीनबाहेरील बाजारपेठ तब्बल १ अब्ज डॉलरपर्यंत पोहोचली आहे.

एका अहवालानुसार भारतीय बाजारपेठेतील १० टक्के वाटा आणि एकूण विक्रीत १५ टक्क्यांनी वाढ दर्शवत शिओमी ही देशातील दुसरी सर्वात मोठी स्मार्टफोन कंपनी झाली आहे. यामुळे कंपनीने त्यांना बढती दिल्याचे जाणकार

## हिंदू विवाह कायद्याला पाकिस्तानमध्ये मंजुरी

पाकिस्तानच्या वरिष्ठ सभागृहाने (सिनेट) हिंदू विवाह कायदा २०१७ ला एकमताने मंजुरी दिली आहे. पुढील आठवड्यामध्ये राष्ट्रपतींनी स्वाक्षरी केल्यानंतर हा कायदा अस्तित्वात येणार आहे. पाकिस्तानमध्ये एकूण लोकसंख्येच्या १.६ टक्के लोकसंख्या हिंदू असून अल्पसंख्याकांमध्ये हिंदूचा पहिला नंबर लागतो.



पाकिस्तानातील पंजाब, बलुचिस्थान, खैबर पुख्तूनवाला या भागांमध्ये हा कायदा लागू होणार आहे. पाकिस्तानातील सिंध प्रांतामध्ये हिंदू विवाह कायदा अगोदरपासूनच अस्तित्वात आहे. कायदा मंत्री झाहिद हामीद यांनी हा कायदा सिनेटमध्ये मांडला होता.

या कायद्यानुसार हिंदू स्त्री–पुरुषांसाठी विवाहाचे वय १८ वर्ष निश्चित करण्यात आले आहे. पाकिस्तानमध्ये हिंदू विवाह कायदा नसल्याने हिंदूंना त्यांच्या लग्नाची नोंदणी करता येत नव्हती. याचा फटका विशेषतः महिलांना बसत होता.

पाकिस्तानमधील मानवाधिकार मंत्र्यांनी हे विधेयक संसदेत सादर केले होते. या विधेयकाला संसदेत बहुमताने मंजुरी देण्यात आली. आता पाकिस्तानमध्ये हिंदू विवाह कायद्याचे उल्लंघन केल्यास ५ हजार पाकिस्तानी रुपयांचा दंड आणि सहा महिन्यांचा तुरुंगवास अशी शिक्षा दिली जाणार आहे.

## सॅमसंगच्या प्रमुखांना भ्रष्टाचार प्रकरणात अटक

जगातील सर्वात मोठ्या कंपन्यांपैकी एक असलेल्या सॅमसंग कंपनीचे प्रमुख जे वाय ली यांना आज भ्रष्टाचाराच्या प्रकरणात अटक करण्यात आली आहे. त्यांना अटक झाल्यानंतर सॅमसंग इलेक्ट्रॉनिक्सची शेअर बाजारात घसरण झाली आहे. सॅमसंग कंपनीचे शेअर १.२ टक्क्यांनी घसरले आहेत.

तत्कालीन राष्ट्रपती पार्क गुन हे यांना ४० दशलक्ष डॉलरची (२६० कोटी रुपये) लाच देण्याचा प्रयत्न ली यांनी केला होता. दोन कंपन्यांचे विलीनीकरण करण्यासाठी त्यांना राष्ट्रपतीच्या मदतीची आवश्यकता होती. त्यामुळेच त्यांनी पार्क गुन यांना लाच देण्याचा प्रयत्न केला होता.

सॅमसंग कंपनी ही दक्षिण कोरियामधील सर्वात मोठी कंपनी आहे. या कंपनीची एकूण किंमत ४०,००० कोटी

रुपये इतकी आहे. सॅमसंगचा दक्षिण कोरियामध्ये दबदबा आहे. सॅमसंग ही कंपनी ली यांच्या आजोबांनी स्थापन केली होती.

पार्क गुन यांच्यावर महाभियोग चालविण्यात आला आणि त्यांच्याकडून राष्ट्राध्यक्ष पदाचे सर्व अधिकार काढून घेण्यात आले. सध्या दक्षिण कोरियाचे पंतप्रधानच काळजीवाहू राष्ट्रपती म्हणून काम पाहतात.